**उपग्रहीय छायाचित्रांचा नगर**
**प्रशासनात वापर करणेबाबत....**

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
माहिती तंत्रज्ञान संचालनालय
शासन निर्णय क्र. : मातंसं/नस्ती-०५/०१/३९,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ११ जानेवारी, २००५

**प्रस्तावना** :-

राज्यातील नागरी क्षेत्रात नव्याने होणारी घरबांधणी तसेच त्या अनुषंगाने आवश्यक ठरणाऱ्या रस्ते वा इतर मुलभूत सुविधांच्या निर्मितीमुळे उपलब्ध जागेच्या वापरात मोठया प्रमाणात बदल होत आहे. वाढत्या नागरिकरणामुळे काही वेळा अनधिकृत बांधकामे, अतिक्रमणे यासारखे प्रश्न नागरी प्रशासनास भेडसावतात. उपग्रहीय छायाचित्रांव्दारे प्राप्त माहितीच्या पृथ:करणाचे तंत्रज्ञान आता अवगत झाले असून त्याचा उपयोग नागरी क्षेत्राचा होणारा वापर तसेच त्याचे नियोजन यासाठी परिणामकारकरित्या करता येणे शक्य आहे. मा.मुख्यमंत्री महोदयांनी सुदूर संवेदन तंत्रज्ञानाचा (Remote sensing technology) नागरी प्रशासनात वापर करण्याचे निदेश दिले आहेत.

***शासन निर्णय*** :--

राज्यातील सर्व नागरी प्रशासनात नागरी क्षेत्राच्या वापराच्या संनियंत्रणासाठी सुदूर संवेदनाव्दारे प्राप्त नकाशांचा वापर करण्याची कार्यपध्दती कालबध्दरित्या अवलंबिण्याचा निर्णय घेण्यात आला असून या अंतर्गत पहिल्या टप्प्यात खालील ८ महानगरपालिकांचा समावेश करण्यात येत आहे.

**(१)** बृहन्मुंबई महानगरपालिका
**(२)** ठाणे महानगरपालिका
**(३)** नागपूर महानगरपालिका
**(४)** पुणे महानगरपालिका
**(५)** नवी मुंबई महानगरपालिका
**(६)** औरंगाबाद महानगरपालिका
**(७)** नाशिक महानगरपालिका
**(८)** कल्याण-डोंबिवली महानगरपालिका

**२.** उपरोक्त नमूद महानगरपालिकांनी महाराष्ट्र सुदूर संवेदन केंद्र, नागपूर (MRSAC) यांचे सल्ल्याने नागरी क्षेत्राच्या वापराच्या संनियंत्रणास उपयुक्त ठरु शकेल अशी यंत्रणा स्थापित करावी. या यंत्रणेचा वापर प्रामुख्याने खालील बाबींसाठी करणे अपेक्षित आहे :--

**अ)** या यंत्रणेचा वापर करुन साधारणतः दर ६ महिन्यांनी महानगरपालिका क्षेत्राचे आवश्यक प्रमाणकानुसार उपग्रहीय छायाचित्र प्राप्त करणे.

**ब)** निश्चित केलेल्या कालावधीत (साधारणतः ६ महिने) प्राप्त उपग्रहीय छायाचित्रांच्या नकाशांनुसार नागरी क्षेत्रात झालेल्या जागेच्या बदलाचे पृथ:करण करुन अनधिकृत बांधकामे, अतिक्रमणे याबाबतची माहिती मिळवून तदनुसार कार्यवाही करणे.

**क)** उपग्रहीय छायाचित्राव्दारे निर्मित नकाशांच्या प्रती वॉर्ड ऑफीसर्सना उपलब्ध करुन देवून त्यांचा वापर अनधिकृत बांधकामे, अतिक्रमणे रोखण्यासाठी तसेच त्यांच्या कार्यक्षेत्राचे संनियंत्रण करण्यासाठी करावा. या नकाशांच्या आधारे निश्चित कालावधीत कार्यवाही न केलेल्या अधिकाऱ्यांवर जबाबदारी निश्चित करणे.

**ड)** अनधिकृत बांधकामे वा अतिक्रमणास संवेदनशील/अनुकूल असलेल्या जागांचे अधिक रिझॉल्युशन असलेले नकाशे प्राप्त करुन त्याबाबतची सविस्तर माहिती मिळवून वेळोवेळी कार्यवाही करणे.

**ई)** उपग्रहीय छायाचित्रांव्दारे तयार करण्यात आलेल्या नकाशांवर Cadastral data अंतर्भूत करुन सिटी सर्व्हे क्रमांक दर्शविण्याची व्यवस्था करणे.

**फ)** मालमत्ता करासारख्या महत्वाच्या उत्पन्नासंबंधी आवश्यक ती माहिती प्राप्त करुन घेणे.

वर नमूद केलेल्या प्रमुख बाबी व यासारख्या इतर आवश्यक ठरु शकणाऱ्या बाबींच्या अनुषंगाने MRSAC, नागपूर यांच्याशी चर्चा करुन संबंधित महानगरपालिकांनी आवश्यक ती कार्यवाही करुन दि. २८ फेब्रुवारी,२००५ पर्यन्त अशी यंत्रणा विकसित करावी व त्याबाबतचा कार्यपालन अहवाल सचिव (माहिती तंत्रज्ञान) आणि प्रधान सचिव (नगर विकास) यांना सादर करावा. यासाठी लागणाऱ्या खर्चाची तरतूद ही संबंधित महानगरपालिकांनीच करावयाची आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( आर. एम. प्रेमकुमार )
**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-१ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/लेखाकोष भवन, वांद्रे (पूर्व),मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,
संचालक, महाराष्ट्र सुदूर संवेदन केंद्र, नागपूर,
महानगरपालिका आयुक्त, बृहन्मुंबई/ठाणे/कल्याण-डोंबिवली/उल्हासनगर/मिरा-भाईंदर/अकोला/
भिवंडी/ पुणे/पिंपरी-चिंचवड/नाशिक/औरंगाबाद/नागपूर/सोलापूर/कोल्हापूर/
सांगली,मिरज आणि कुपवाड/अमरावती
निवड नस्ती.